राष्ट्रीय वनीकरण कार्यक्रम (६० : ४०) केंद्र व राज्य योजने अंतर्गत सन २०१६-१७ करिताचा बांधील कामांचा चालू बाब प्रस्ताव.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : एफडीएम-२०१६/प्र.क्र.२२९/फ-२**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- १६ मार्च, २०१७

वाचा :- १) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.०४.२०१६.

२) पर्यावरण, वन आणि वातावरणीय बदल मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.MoEF&CC (NAEB) : २-१/२०१६-B-III, दि.३०.०६.२०१६

३) पर्यावरण, वन आणि वातावरणीय बदल मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.MoEF&CC (NAEB) : २-१/२०१६-B-III, दि.३०.०६.२०१६

४) पर्यावरण, वन आणि वातावरणीय बदल मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.MoEF&CC २-१/२०१६-B-III (NAEB), दि.३०.०६.२०१६

५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/सी/मरावविय/वाकृआ/प्र.क्र.०९/८०१/१६-१७, दि.२६.०७.२०१६.

६) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.एफडीएम-२०१६/प्र.क्र.२२९/फ-२, दि.१९.०९.२०१६

७) पर्यावरण, वन आणि वातावरणीय बदल मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.MoEF&CC (NAEB) : २-१/२०१६-B-III, दि.०९.०२.२०१७

८) पर्यावरण, वन आणि वातावरणीय बदल मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.MoEF&CC (NAEB) : २-१/२०१६-B-III, दि.०९.०२.२०१७

९) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/सी/मरावविय/वाकृआ/प्र.क्र.०९/२१८७/१६-१७, दि.२३.०२.२०१७.

**प्रस्तावना :-**

वन विभागांतर्गत सुरु असलेली राष्ट्रीय वनीकरण कार्यक्रम ही केंद्र सहाय्यीत योजना केंद्र व राज्य शासन यांच्या अनुक्रमे ६० : ४० हिस्स्यातून राबविण्यात येत आहे. त्याअनुषंगाने राष्ट्रीय वनीकरण कार्यक्रम या योजनेअंतर्गत सर्वसाधारण आणि अनुसूचित जाती उप योजना या घटकाकरिता बांधील कामासाठी केंद्र शासनाकडून संदर्भ क्र.२ व ३ येथील दोन पत्रान्वये प्राप्त झालेला निधी या विभागाच्या संदर्भ क्र.६ येथील दि.१९.०९.२०१६ रोजीच्या पत्रान्वये वितरीत करण्यात आलेला आहे.

२. आता, केद्र शासनाच्या संदर्भ क्र.७ व ८ येथील दोन पत्रान्वये सर्वसाधारण आणि अनुसूचित जाती उप योजना या घटकाकरिता केंद्र शासनाच्या ६० % हिस्स्याप्रमाणे (उर्वरीत २५ %) अनुक्रमे रु.१३६.६४ लक्ष व रु.१८.१८ लक्ष इतका निधी राज्य शासनाकडे सुपूर्द केला आहे.

३. सदर योजनेंतर्गत सन २०१६-१७ या वर्षाकरिता सर्वसाधारण घटकांतर्गत केंद्र (२४०६८४८२) व राज्य (२४०६A०१३) हिस्स्यांकरिता अनुक्रमे रु.१२००.०० लक्ष व रु.८००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित केलेला आहे. तर, अनुसूचित जाती उप योजना या घटकांतर्गत केंद्र (२४०६८४९१) व राज्य (२४०६A०२२) हिस्स्यांकरिता अनुक्रमे रु.३००.०० लक्ष व रु.२००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित केलेला आहे.

४. उपरोक्त वस्तुस्थितीच्या अनुषंगाने, सदर योजनेअंतर्गत सर्वसाधारण व अनुसूचित जाती उप योजना या घटकांकरिता केंद्र शासनाकडून ६० % हिस्स्याच्या अनुषंगाने प्राप्त झालेला निधी व त्यास अनुसरुन राज्य शासनाचा ४० % निधी वितरित करण्याचा प्रस्ताव अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.९ येथील दि.२३.०२.२०१७ रोजीच्या पत्रान्वये शासनास मान्यतेसाठी सादर केलेला असून सदरचा निधी वितरीत करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

५. उपरोक्त वस्तुस्थितीचा विचार करता, केंद्र शासनाने संदर्भ क्र.७ व ८ वरील दि.०९.०२.२०१७ रोजीच्या दोन पत्रांन्वये सर्वसाधारण व अनुसूचित जाती उप योजना या घटकांकरिता दुसऱ्या हफ्त्यापोटी वितरीत केलेला निधी आणि त्याअनुषंगाने राज्य शासनाच्या हिस्स्यांकरिता पुढीलप्रमाणे उद्दिष्टनिहाय निधी महाराष्ट्र राज्य वनविकास यंत्रणा तथा अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात येत आहे :-

**(रक्कम लाखात)**

| अ. क्र. | लेखाशीर्ष / संकेतांक | ०२ मजूरी | २१ पुरवठा व सामग्री | ५० इतर खर्च | **एकूण** |
|---|---|---|---|---|---|
| १ | "राष्ट्रीय वनीकरण कार्यक्रम (सर्वसाधारण) (६० % केंद्र हिस्सा) (२४०६ ८४८२) | ७५.०० | २०.०० | ४१.६४ | **१३६.६४** |
| २ | "राष्ट्रीय वनीकरण कार्यक्रम (सर्वसाधारण) (४० % राज्य हिस्सा) (२४०६ A०१३) | ५०.०० | १३.०० | २८.१३ | **९१.१३** |
| ३ | "राष्ट्रीय वनीकरण कार्यक्रम (अनुसूचित जाती उपयोजना) (६० % केंद्र हिस्सा) (२४०६ ८४९१) | १०.०० | ३.०० | ५.१८ | **१८.१८** |
| ४ | "राष्ट्रीय वनीकरण कार्यक्रम (अनुसूचित जाती उपयोजना) (४० % राज्य हिस्सा) (२४०६ A०२२) | ७.०० | २.०० | ३.१२ | **१२.१२** |
| | **एकूण** | **१४२.००** | **३८.००** | **७८.०७** | **२५८.०७** |

६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधी या विभागाकडून मंजूर केलेल्या प्रस्तावातील क्षेत्र / कार्यक्रम / कामे यावरच खर्च होईल व कामाची द्विरुक्ती होणार नाही आणि मंजूर कामांव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर /नवीन क्षेत्रावर/ नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच सदरहू निधी वितरित करण्यापूर्वी प्रस्तावानुसार योजनेतील निश्चित केलेल्या कामांना सक्षम प्राधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी असल्याची व त्याचबरोबर सध्या वाटप करण्यात येणा-या अनुदानातून खर्च करताना यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी. त्याचप्रमाणे, वित्त विभागाच्या दि.२०.०४.२०१६, दि.१२.०८.२०१६ व दि.०८.०२.२०१७ रोजीच्या शासन परिपत्रकातील अटी व शर्तींची पूर्तता करण्यात येईल याची देखील दक्षता घ्यावी.

७. सदर योजनेवर केंद्र हिस्स्याकरिता होणारा खर्च मागणी क्र.सी-७, प्रधान शीर्ष - २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०१, वनीकरण, १०२ सामाजिक व क्षेत्रीय वनीकरण, केंद्र पुरस्कृत योजना, (१२) राष्ट्रीय वनीकरण कार्यक्रम, (११) सामाजिक व क्षेत्रीय वनीकरण, केंद्रीय पुरस्कृत योजना, **(११) (१९)** राष्ट्रीय वनीकरण कार्यक्रम (६० % केंद्र हिस्सा) (सर्वसाधारण) (२४०६८४८२) आणि (११) (२०) राष्ट्रीय वनीकरण कार्यक्रम (६० % केंद्र हिस्सा) (अनुसूचित जाती उपयोजना) (२४०६८४९१) या दोन लेखा शिर्षाअंतर्गत सन २०१६-१७ मध्ये मंजुर असलेल्या अनुदानातुन भागविण्यात यावा.

८. त्याचप्रमाणे, सदर योजनेवर राज्य हिस्स्याकरिता होणारा खर्च मागणी क्र.सी-७, प्रधान शीर्ष - २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०१, वनीकरण, १०२ सामाजिक व क्षेत्रीय वनीकरण, केंद्र पुरस्कृत योजना, (१२) राष्ट्रीय वनीकरण कार्यक्रम, (११) सामाजिक व क्षेत्रीय वनीकरण, केंद्रीय पुरस्कृत योजना, (११) (२४) राष्ट्रीय वनीकरण कार्यक्रम (४० % राज्य हिस्सा) (सर्वसाधारण) (२४०६ A०१३) आणि ७८९, अनुसूचित जाती उप योजना, (०१) सामाजिक व क्षेत्रीय वनीकरण, (०१) (०१) राष्ट्रीय वनीकरण कार्यक्रम (४० % राज्य हिस्सा) (अनुसूचित जाती उपयोजना) (२४०६A०२२) या दोन लेखा शिर्षाअंतर्गत सन २०१६-१७ मध्ये मंजुर असलेल्या अनुदानातुन भागविण्यात यावा.

९. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.अनौ-१२२/अर्थोपाय, दि.१०.०३.२०१७ अन्वये प्राप्त सहमतीनुसार तसेच वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ मधील भाग पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१६१५१६२८३९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dattatray Laxman Thorat

Digitally signed by Dattatray Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e99493394e30f531116ee97373b411b529e251aecc25fd9c455defa0031292a7, cn=Dattatray Laxman Thorat
Date: 2017.03.16 15:18:02 +05'30'

**( डी.एल.थोरात )**
सह सचिव
महसूल व वन विभाग

**प्रति :-** १) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३) मुख्य वनसंरक्षक (प्रा.), सर्व

४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.

५) सह सचिव /उप सचिव (अर्थ-६) /व्यय-१०/अर्थोपाय, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

६) सह सचिव /उप सचिव (विशेष घटक योजना), सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

७) उप सचिव (कार्यासन १४७५), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

८) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

९) निवडनस्ती, फ-२ कार्यासन,महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.